वैधानिक विकास मंडळांसाठी ठेवण्यात येत
असलेल्या नियतव्ययातून घ्यावयाच्या
कामांबाबत मार्गदर्शक सूचना व कार्यपध्दती

**महाराष्ट्र शासन,**
नियोजन विभाग
शासन निर्णय क्रमांकः- वैविमं-११०१/प्र.३३८/का.१४५२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांकः- ३१ ऑक्टोबर २००२

संदर्भ :- नियोजन विभाग शासन निर्णय क्र. वैविमं-१००१/प्र.१७१/का.१४५२, दि. २३ ऑगस्ट २००१.

**शासन निर्णय**

संदर्भाधीन शासन निर्णयासोबतच्या प्रपत्र-२ मधील अ.क्र.५ येथील "गावातील अंतर्गत रस्ते" ही नोंद वगळण्यात येत असून प्रपत्र-१ मधील अ.क्र.२३ नंतर अ.क्र.२४ म्हणून "गावातील अंतर्गत रस्ते त्यासोबत पाण्याचा निचरा होण्यासाठी गटार/नाली बांधकामासह" अशी नोंद वाचण्यात यावी. तसेच पंतप्रधान ग्राम सडक योजनेतून गावे जोडणा-या रस्त्यांची कामे घेण्यात येत असल्याने अशी जोडरस्त्यांची कामे या निधीतून घेण्यात येऊ नयेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( प्र.द.कुळकर्णी )
उप सचिव, नियोजन विभाग

प्रत :-
(१) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
(२) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
(३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
(४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
(५) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
(६) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-४०० ०३५
(७) सर्व विभागीय आयुक्त
(८) सदस्य सचिव, विदर्भ वैधानिक विकास मंडळ, दक्षिण अंबाझरी रोड, नागपूर-२२
(९) सदस्य सचिव, मराठवाडा वैधानिक विकास मंडळ, औरंगाबाद
(१०)सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, मुंबई
(११)सर्व जिल्हाधिकारी
(१२)निरनिराळया विभागातील विभाग प्रमुख/प्रादेशिक प्रमुख
(१३)वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-१५)
(१४)सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
(१५)नियोजन विभागातील सर्व अधिकारी